दि 29-11-1991 व 9 सप्टेंबर 1993 रोजी झालेल्या शासकीय कर्मचा-यांच्या लाक्षणिक संपात भाग घेऊन अनुपस्थित राहीलेल्या कर्मचा-यांबाबत ---

महाराष्ट्र शासन
सामान्य प्रशासन विभाग,
शासन निर्णय क्रमांक :- एसटीके-1093/सीआर-57/16-अ,
मंत्रालय, मुंबई 400 032 दिनांक:- 4 एप्रिल 1994

**वाचा** - 1) शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्र. एसटीके-1091/सीआर-70/16-अ, दि 26-11-1991

2) शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्र.एसटीके-1093/सीआर-57/93/16-अ, दि.7 सप्टेंबर 1993.

**शासन निर्णय** :- केंद्रशासनाच्या आर्थिक, औद्योगिक व कामगार विरोधी धोरणाचा निषेध करण्यासाठी महाराष्ट्र शासनाचे अराजपत्रित कर्मचारी दि.29-11-91 व दि.9-9-93 रोजी प्रत्येकी एक दिवसाच्या लाक्षणिक संपावर गेले होते. सदर संपात भाग घेऊन जे शासकीय कर्मचारी कामावर अनुपस्थित होते त्यांची अनुपस्थिती कशी नियमित करावी असा प्रश्न शासनाच्या विचाराधीन होता. यासंबंधात शासन आता असे आदेश देत आहे की, दि.29 नोव्हेंबर 1991 व दि.9 सप्टेंबर 1993 रोजी अनुपस्थित राहीलेल्या कर्मचा-यांपैकी जे कर्मचारी त्या दिवसाच्या अनुपस्थितीसाठी ज्या देय व अनुज्ञेय रजेची किंवा नैमित्तिक रजेची मागणी करतील ती त्यांना द्यावी व इतरांच्या बाबतीत महाराष्ट्र नागरी सेवा रजा नियम 1981 च्या नियम 63 प्रमाणे असाधारण रजा (विनावेतन रजा) देऊन अनुपस्थितीचा कालावधी नियमित करण्यात यावा. मात्र असाधारण रजेवर असताना अनुज्ञेय असलेले भत्ते (स्थानिक पूरक भत्ता व घरभाडे भत्ता) त्यांना देण्यात यावेत.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

अ.तु.वाघमारे,
उप सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रति,

राज्यपालांचे सचिव
मुख्य मंत्र्यांचे सचिव,
सर्व मंत्री/राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
शासनाचे सर्व सचिव,
× प्रबंधक, मूळ न्याय शाखा, उच्च न्यायालय, मुंबई,
× प्रबंधक, उच्च न्यायालय, अपील शाखा मुंबई,
× प्रबंधक, लोकायुक्त आणि उप लोकायुक्त यांचे कार्यालय, मुंबई,
महालेखापाल, लेखा व हक्कदारी, महाराष्ट्र-1, मुंबई,
महालेखापाल, लेखा परीक्षा, महाराष्ट्र-1, मुंबई,
महालेखापाल, लेखा व हक्कदारी, महाराष्ट्र-2, नागपूर,
महालेखापाल, लेखा परीक्षा, महाराष्ट्र-2, नागपूर,
निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई/अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
× सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई,
सर्व विभागीय आयुक्त/सर्व जिल्हाधिकारी,
सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषदा,
संचालक, लेखा व कोषागरे, मुंबई/सर्व कोषागार अधिकारी,
मंत्रालयीन विभागाच्या अधिपत्याखालील सर्व इतर विभाग प्रमुख व कार्यालय प्रमुख,
मंत्रालयातील सर्व विभाग,
निवड नस्ती,
× पत्राने.

-------

शा.म.मु./रोटा/एच-145(4000-4-94)